सौष्ठव प्रकाशन
प्रकाशन दिनांक
१५ जाने. १९९८

संपादकीय,

'दलित' ही जात नसून ती एक व्यापक जाणीव आहे. ह्या जाणीवेतून निर्माण झालेल्या साहित्याची प्रेरणा डॉ. बाबासाहेब आंबेडकरच आहेत, हे निर्विवाद! व्यवस्थेनं इथल्या ज्या ज्या माणसांचं जगणं नाकारलं, त्यांचे मूलभूत हक्क नाकारलेत, 'माणूस' म्हणून त्यांचं अस्तित्व नाकारलं त्या तमाम मानवी समूहाचा आवाज ह्या दलित साहित्यातून उठलेला दिसतो. त्यातही दलित कविता आपला चेहरा अधिकाधिक स्पष्ट करत चाललीय. पहिल्या पिढीचा भोगलेले दुःख सांगणारा सूर, दुसऱ्या पिढीचा विद्रोहाचा सूर तर तिसऱ्या पिढीचा 'एक घाव-दोन तुकडे' करणारा सूर म्हणजे दलित कवितेचा झालेला विकासच होय. ही कविता विद्रोहाबरोबरच आपल्या हक्कासाठी व्यवस्थेसोबत लढणारी आहे, प्रेमही करताना स्वतःची अस्तित्वजाणीव ठेवणारी आहे, माणसाला 'माणूसपण' मिळवून देण्यासाठी धडपडणारी आहे.

तिसऱ्या पिढीची 'दलित कविता' ही येणाऱ्या 'काळा'च्या चिंतनातून निर्माण झालेली आहे. यापुढील दलित कवितेची ओळख या कवितांमधून व्हावी, म्हणून हा 'प्रातिनिधिक' कवितांचा संग्रह आपणापुढे ठेवतोय.

निमित्त: 20 वा अस्मितादर्श साहित्य मेळावा ९८.

या उपक्रमासाठी अनेकांचे सहाय्य लाभले त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार!

मं. गो. राठोड

मुंबई: १९९८

प्रिय भीमा!

॥एक॥

तुला आठवते भीमा,
कबुतर आणि मुंगीची गोष्ट
ती पुन्हा आठव आणि ऐक
आमची नवी "जाचक-कथा"

प्रिय भीमा,
तू सतत आमच्या आभाळावरुन उडणारं
शांततेचं अस्वस्थ कबुतर.
आणि आम्ही मुंग्या.
४३ वर्षांच्या एका मुर्दाड शिकाऱ्याच्या
टाचेखाली अडकलेल्या.
तू वाचवलंस आम्हाला चवदार तळ्यातल्या
काळ्या पाण्यात बुडताना
एकेक पान खुडून खुडून संस्कृतीचं.
शिका, एक व्हा, संघर्ष करा म्हणत.

आम्ही ऐकतोय अजून तुझा दैवी आवाज
तुझ्या जयंती-स्मृतिदिनांच्या मंडपातून येणारा.

ह्या मुंग्यांना माफ कर भीमा,
टाचेखालच्या गवतातच त्यांना एक गगन
गवसलं आहे/सुरक्षित वाटू लागलं आहे,
आणि तुझ्या आवाजातला झंझावात
त्यांना मंत्र्याच्या गाडीवरच्या
लाल दिव्यासारखा परका परका वाटू लागलाय.

॥दोन॥

ह्या शताब्दीसोहळ्यात तुझ्या लक्षात आले
काय भीमा,
की तुझ्या आवाजातला झंझार
इथल्या प्रजासत्ताक कातडीवर
एक शहाराही उमटवू शकला नाही ते?

मुंग्या आता डबक्यात बुडत नाहीत. इतकेच.
पण हे डबके कायमचे हलवण्यासाठी
चौकाचौकात उभ्या केलेल्या
तुझ्या पुतळ्यांचा देखावा उपयोगाचा
नाही भीमा !

उलट तुझ्या काळ्या ब्रॉन्झच्या
निर्जीव पुतळ्यात तुला निरंकुश पाहताना
साऱ्यांनाच कसे सुटका झाल्यासारखे
मोकळे मोकळे वाटत आहे ते... बघ!

॥तीन॥

अरे भीमरावा, सांग
तू सारथ्य करावंस आमच्या मनोलढ्याचं
आणि तुझ्या कर्तृत्वाचं चाक जातीच्या चिखलात
रुतावं, एवढीच आमची नियती होती काय?
आणि साऱ्यांवर समतेचं तीर्थ शिंडकणारा
तुझा, घटनेचा अंगठा कादून घेऊन
तुला एकलव्यासारखं एकटं पाडायचं
एवढाच सम्यक इतिहास तुला लाभला
होता काय?

तू चालत गेलास गटारातून,
थेट बोधिवृक्षांच्या प्रदेशात
एखाद्या राजसंन्याशासारखा–
दिवे लावीत, रस्त्यांच्या दुतर्फा
"जग बदलविण्याची" स्वप्नं पेरीत–
आज इथला कुठलाच राजमार्ग
आनंदनगर आणि सिध्दार्थनगरच्या
वस्तीवरुन जात नाही भीमा.
तुझ्या आदेशांचा कंदील एकट्याने
लटकतोय भिंतीवर
मोर्चामोर्चाने येऊन साऱ्यांनी त्यातली
लांबलचक वात मोरबाडून नेलीय....

॥चार॥

भीमा, तू हे काय केलंस बाबा,

शिकवता - शिकवता
व्यवस्थेच्या कपाळावरच्या खपल्या उचकटून
गेलास,
आणि भळभळून टाकलास अवघा समाज.
दशका मागून दशके चाललीत
आणि तुझ्या धर्मांतराचं पाणी आता आमच्या
सगळ्यांच्याच जखमेतून वाहू लागलंय......

॥पाच॥

भीमा,
अरे, तुझ्या स्मृतीदिनांच्या पहाटे वीर्यहीन
झालेला सूर्य. संध्याकाळी
भाषणांनी / आश्वासनांनी नपूंसक
झालेला पाहतो आम्ही.
आणि तुझ्या सुटाबुटातल्या छबीनं
आक्रमक होण्याऐवजी आम्ही
गलितगात्र षंढासारखे गुंगीत जातो
मग भीमा, असे वाटते,
की ह्या पताका लावताना, रोषणाई करताना
जणू आमच्या जखमेवर ऑफसेट कलरचं
शोभिवंत बँडेजच बांधीत आहोत आम्ही.
आणि संघर्षाचे तान्हुले पोर घेऊन
आम्ही बाजाराच्या आडरस्त्याने
सरणाकडे चाललो आहोत... चालत आहोत!

॥सहा॥
माफ कर भीमा...
तू आमच्या आभाळावरचा निरंतर पक्षी - मान्य!
तुला हे आख्खं आभाळ मिळेल
दिवसभर विहरण्यासाठी... मान्य!
अगदी पार्लमेंट हाऊसच्या शिखरावरचं
बोट क्लबच्या मैदानावरचं,
लाल किल्ल्याच्या बुरुजावरचं!
सारं मिळेल... दरवर्षी... जयंतीला...
स्मृतिदिनाला.

पण वस्तीसाठी, रात्रीच्या वेळी
ऊब देणारं एक हक्काचं खोपटं मिळणं
खूप कठीण आहे भीमा.
खूप खूप कठीण आहे... ह्या देशात!

——— अरुण म्हात्रे

## तेव्हा...

जेथे गावगाडा नाही
अशी एखादी वाट असेल काय?
जेथील काळोख संपला
असे एखादे गाव असेल काय?
ही पृथ्वी आता चंद्रावर वस्ती करू लागेल
तेव्हा गावकुसाबाहेरील वस्ती नसेल काय?

——— दया हिवराळे

## समारोप

शस्त्रांच्या सावल्या अंगावर पडल्या म्हणून
उन्हापासून बचाव होतो
अशा खुळ्या समजुती जोपासणारा मी नाही
मनुच्या देव्हाऱ्यात शूद्रांच्या वेदवाचनाच्या गोष्टी
तुम्ही मला सांगू नका.
झरे कोठून उगवतात आणि कोठे आटतात
हे मला चांगले ठावूक आहे.
माझ्या दाढीतल्या काळ्या-पांढऱ्या केसांचा हिशोब
तुमच्या जळकुंडात अहोरात्र चाळत असतो
पण घडते असे की,
माझ्या मुक्कापर्यंत तुमच्या पारंब्या पोहचतच नाहीत
हल्ली नाड्या भूमिगत करूनच मी

आजवरच्या सर्व भूकंपांचे उत्खनन करीत आहे.
अन्यथा तुमच्या वेदी आणि जल्लाद
असे बेकार झाले नसते.
गळा कापण्या आधी टिळा लावण्याच्या तुमच्या
शास्त्रशुध्द नोंदी अजूनही माझ्यापाशी आहेत
माझ्या सत्काराचे स्वप्न पाहणे आता सोडून द्या.
तुमच्या स्मृती-शास्त्रांच्या समारोपासाठी
आलो आहे मी.

बळी खैरे

---

# भूमिका

सॉरी, सद्यास्थितीत मी तुमचे
काहीही ऐकून घेण्याच्या मनःस्थितीत नाहीये.
तुम्ही कृपया ऐकवू नका मला
युध्दात शरणागती पत्करल्याने जीवनदान मिळते
किंवा,
अणूबॉंबचा वापर फक्त शांततेसाठीच व्हावा
कारण
माझ्या मेंदूत फार आधीपासूनच
अणूबॉंब बनण्याची प्रक्रिया सुरु झाली आहे.
मी तुमच्याशी दोन हात करायला
कधीचा तयार आहे
आता मी अडकून पडू इच्छित नाही
प्रेयसीच्या नाजूक विळख्यात
या पुढे मी करणार नाही
पुस्तकी ज्ञानाचा वापर
मला काहीतरी कृती केलीच पाहिजे
माझी भूमिका स्पष्ट केलीच पाहिजे
"माणसांसाठी लढणारा मी!"

तुम्ही कृपया करू नका मला
तुमच्या 'फॅसिस्ट' डोळ्यांनी शांततेचं आवाहन

मी माझी 'कीट' पाठीवर बांधलेली आहे
माझे पाय
युध्दभूमीचा रस्ता चालू लागले आहेत.

— मंगेश बनसोड

# वस्तीची कविता

बापाच्या छातीच्या बरगड्या
आईच्या डोक्याचा पेटारा
मला तुझ्यात गुंतू देत नाहीत

इतिहासाच्या पानापानात दडलेल्या
माझ्या आज्यापंज्यांच्या शोषणाच्या शोकांतिका
मला तुझ्या गजऱ्याचा सुगंध घेऊ देत नाही.

काळ्या पाण्याची शिक्षा भोगणाऱ्या
कैद्यासारखी इथली एक-एक वस्ती
काळ्या विवरात लोटत असते
इथल्या प्रत्येकाला अनाहूतपणे !
तीस वर्षांची तरुणी साठ वर्षांची म्हातारी होते
पापड लाटता-लाटता किंवा बिड्या बांधता बांधता
आणि चाळीस वर्षांचा रिक्षेवाला बनतो
ऐंशी वर्षांचा जर्जर म्हातारा
त्यांच्या डोळ्याभोवतीची काळी वर्तुळं
बघितली की,
माझ्यातला रोमॅण्टीक हिरो पार गुदमरुन जातो.

मी तुझ्यात गुंतू शकतो, पार डुंबू शकतो
तू फक्त एक कर —
माझ्या डोक्यातला मेंदू माझ्या आठवणींसह
बदलवून टाक.

— चंद्रकांत सरदार

तुझ्या शहरातील तुझ्या कविता

॥१॥

ऐन वसंतात
शहरातली तुझ्या ही झाडं
नागडी उघडी कशी
आणि सगळीच पाखरं अशी
मुकी कशाने झालीयेत ?
तुझ्या भग्न काळजाच्या पिंजऱ्यात
शहरातल्या पाखरांना
तू बंदिस्त केलंस म्हणे !
पाखरांना मनसोक्त उडू देणं चांगलं
नाहीतर पंख दुखतात त्यांचे
आणि रडतात काळजं ओक्साबोक्सी !

॥२॥

तुला विस्तवाची भीती वाटतेय का ?
तुला तुझं शहर प्रिय नाही का ?
तुझं शहर
पेटलंय चोहिकडून तरीही
तू इतकी कावडलेली कशी ?
निखारे तुझ्या शहराचे
तू कवटाळ उराशी
म्हणजे
चेततील तुझीही रंध्रानिरंध्र !

॥३॥

तुझं शहर पूर्वीसारखंच
हिरवेगर्द झालेलं पहायचय का तुला ?
पाखरांचा किलकिलाट ऐकायचाय का तुला ?
आणि तुझं शहर नव्यानं
हसतांना, झुलताना पहायचंय का तुला ?
मग,
उघड तुझ्या शहराच्या वेशीचा
लोखंडी दरवाजा आणि
येऊ दे आत मला.

तुझ्या शहराचा हरवलेला चेहरा
शोधण्याचा
मी नक्कीच प्रयत्न करीन !

— सुरेश नामदेव कांबळे

## षंढ

वाचन-मनन-चिंतन, दोन रुपयाची भजी
यावर मी दिवसभर
सिंहासारखा जगतो गं!
कुठल्याही शेळी-मेंढीचा वास
मला स्पर्श करत नाही

शिल्पे,
तुकडोजी महाराजांच्या भजनातील
माझं घर आहे.
त्याला ताटी नाही की दार नाही
येणाऱ्या-जाणाऱ्याचं कुठं नाव नाही
इथं येणारा प्रत्येकजण
बंदूक शस्त्रादी खांद्यावर घेऊनच येत असतो.

शिल्पे,
भरलेली बंदूक खांद्यावर घेऊन
तुझ्या वस्तीत यावं
तुझ्यासारख्या अनेक जणींचा
गळा सोडून छाती पिचकून खून करावा
मध्ये जो आडवा येईल
त्याच्यावर खांद्यावरील बंदूक खाली करावी
अशा शांत विचारात मी!
आणि
तू करीत असतेस
'कठीण कठीण कठीण किती'चा सराव !

शिल्पे,
तुझे स्वर माझ्या मेंदूत
वासनांचे वळ उठवून गेले
त्यांनी माझे लिंग केधीचेच छाटून नेले
शिल्पे, आतापर्यंत मी सिंह होतो गं!
ही रात्र आता मला
षंढ बनविणार आहे !

— रोहन नागदिवे

## ॥दलित ब्राम्हणांसाठी एक कविता॥

तुम्ही म्हणता तसे सारेच बिघडलेले नाही अजून
इथली माती
इथला सूर्य
इथली हवा
इथले पाणी
ह्या साऱ्यांना अजूनही माणसाचा वास येतो

तुम्ही निर्माण केलेल्या परीकथा तुमच्या अवास्तव
आणि सरकारी सुरक्षित खिडकीतून वाराही येणार नाही
याची दक्षता घेऊन
तुम्ही न्याहाळलेले इथले वास्तव
दाखवत राहत तुम्हाला
पाण्याच्या पोटातून बेलगाम वाहणारे रक्ताचे पाट
पोटात नळ्या आहेत म्हणून देहाने विकलेल्या
योनीचे माठ
दम्याच्या पाठशाळेत दाखल होत जाणाऱ्या
तरुणांच्या जमा
आणि श्वासाच्या अंतरावर उभे राहूनही
ज्यांचे श्वास मोजता येत नाहीत
अशा अस्तित्वाच्या यात्रा
हे सारं वास्तव तुम्हाला दिसतं
हे सारं वास्तव तुम्ही पाहता
पण हे ही वास्तव आहे की
प्रत्येक माणसातून वाहत असते एक पवित्र माणूसकी
जी रक्तातून शोधून काढते मराडचे पाणी
प्रत्येक स्तनात हलत असतो एक पाळणा
जो गात असतो गौतमीची प्रेमळ गाणी
प्रत्येक तरुणाच्या नष्ट होत चाललेल्या
फुफ्फुसात असतो
एकतरी उगवतीचा श्वास
जो सूर्याला आज्ञा देण्याची स्वप्ने असतो पहात
आणि श्वासाच्या अंतरावर
श्वासच असतो माणसाचा
हे ही उमगून असतो प्रत्येक श्वास

त्यामुळे हे सारे बदलेल
न बदलेल
पण तुम्ही म्हणता तसे सारेच बिघडलेले नाही अजून
इथली माती– इथला सूर्य– इथली हवा
इथले पाणी – इथली प्रणाली – इथली गाणी
ह्या साऱ्यांना अजूनही माणसाचा वास येतो

श्रीधर तिळवे





# तिसऱ्या पिढीची दलित कविता

संपादक :
मंगेश बनसोड

## लीडर

एक मोर्चा
नायक होऊन आम्ही घेऊन गेलो
आम्ही पुढे, मोर्चा मागे

□ □

एकाएकी मोर्चाचे संतुलन जाऊ लागले
समोर पोलिसही शस्त्रसज्ज
आम्ही नायक सावध / मोर्चा पुढे, आम्ही मागे

□ □ □

अटीतटीच्या वेळी मोर्चातून आम्ही पळ काढला
आणि
रस्त्यावरील एका छक्क्याने आम्हाला गांडू म्हटले

— लोकनाथ यशवंत

(भीता होऊन जाऊ द्या मधून साभार)

---

आखिल भारतीय मराठी
साहित्य संमेलन १९९४
च्या निमित्ताने

भालचंद्र नेमाडेंनी मांडले
'टीका स्वयंवर'
श्रीधर तिळवे करीत आहेत
'टीका हरण'

देशीवादाचा मराठीतील
पहिलाच झाड
देशीदारू कि इंडियन स्कॉच!

सोबत परिशिष्ट
देशादेशातील देशीवाद आणि
स्त्रीवाद एक तुलना
– ज्ञानदा ठाकूर

**सौष्ठव : ९४**

मूल्य : ७५ रुपये : लवकरच प्रसिद्ध होत आहे
नोंदणी : २०५/८२३६, कन्नमवार नगर, विक्रोळी, मुंबई-८३.
दूरध्वनी : ५७८ ७८ ३७ / २०७ ०९ ८६

---

आभार : प्रविण पेंढारकर
प्रकाशक : भालचंद्र कुबल
मुखपृष्ठ : पंकज सोनवणे
(खाजगी वितरणासाठी / देणगी मूल्य रु. ५/- फक्त)
२०५/८२३६, कन्नमवार नगर, विक्रोळी, मुंबई - ४०० ०८३




## लीडर

एक मोर्चा
नायक होऊन आम्ही घेऊन गेलो
आम्ही पुढे, मोर्चा मागे
□ □
एकाएकी मोर्चाचे संतुलन जाऊ लागले
समोर पोलिसही शस्त्रसज्ज
आम्ही नायक सावध / मोर्चा पुढे, आम्ही मागे
□ □ □
अटीतटीच्या वेळी मोर्चातून आम्ही पळ काढला
आणि
रस्त्यावरील एका छक्क्याने आम्हाला गांडू म्हटले

लोकनाथ यशवंत
(आता होऊन जाऊ द्या मधून साभार)

---

अखिल भारतीय मराठी
साहित्य संमेलन १९९८
च्या निमित्ताने
भालचंद्र नेमाडेंनी मांडले
'टीका स्वयंवर'
श्रीधर तिळवे करीत आहेत
'टीका हरण'

देशीवादाच्या मराठीतील
पहिलाच झाडा
देशीदारू कि इंडियन स्कॉच!
सोबत परिशिष्ट
देशादेशातील देशीवाद आणि
स्त्रीवाद एक तुलना
-ज्ञानदा ठाकूर

**सौष्ठव:९४**
मुल्य : ४५रुपये : लवकरच प्रसिद्ध होत आहे
नोंदणी : २०५/८२३६, कन्नमवार नगर, विक्रोळी, मुंबई-८३.
दूरध्वनी : ५७८ ७८ ३७ / २०४ ०९ ८६

आभार : प्रविण पेंढारकर
प्रकाशक : भालचंद्र कुबल
मुखपृष्ठ : पंकज सोनवणे
(खाजगी वितरणासाठी / देणगी मूल्य रु. ५/- फक्त)
२०५/८२३६, कन्नमवार नगर, विक्रोळी, मुंबई-४०० ०८३

सौष्ठव प्रकाशन
प्रकाशन दिनांक
१५ जाने. १९९८

## संपादकीय,

'दलित' ही जात नसून ती एक व्यापक जाणीव आहे. ह्या जाणीवेतून निर्माण झालेल्या साहित्याची प्रेरणा डॉ. बाबासाहेब आंबेडकरच आहेत, हे निर्विवाद! व्यवस्थेनं इथल्या ज्या ज्या माणसांचं जगणं नाकारलं, त्यांचे मूलभूत हक्क नाकारलेत, 'माणूस' म्हणून त्यांचं अस्तित्व नाकारलं त्या तमाम मानवी समूहाचा आवाज ह्या दलित साहित्यातून उठलेला दिसतो. त्यातही दलित कविता आपला चेहरा अधिकाधिक स्पष्ट करत चाललीय. पहिल्या पिढीचा भोगलेले दुःख सांगणारा सूर, दुसऱ्या पिढीचा विद्रोहाचा सूर तर तिसऱ्या पिढीचा 'एक घाव-दोन तुकडे' करणारा सूर म्हणजे दलित कवितेचा झालेला विकासच होय. ही कविता विद्रोहाबरोबरच आपल्या हक्कासाठी व्यवस्थेसोबत लढणारी आहे, प्रेमही करताना स्वतःची अस्तित्वजाणीव ठेवणारी आहे, माणसाला 'माणूसपण' मिळवून देण्यासाठी धडपडणारी आहे.

तिसऱ्या पिढीची 'दलित कविता' ही येणाऱ्या 'काळा'च्या चिंतनातून निर्माण झालेली आहे. यापुढील दलित कवितेची ओळख या कवितांमधून व्हावी, म्हणून हा 'प्रातिनिधिक' कवितांचा संग्रह आपणापुढे ठेवतोय.

निमित्त : 20 वा अस्मितादर्श साहित्य मेळावा ९७.

या उपक्रमासाठी अनेकांचे सहाय्य लाभले त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार!

मंगेश बनसोड
मुंबई : १९९८

प्रिय भीमा!

॥एक॥

तुला आठवते भीमा,
कबुतर आणि मुंगीची गोष्ट
ती पुन्हा आठव आणि ऐक
आमची नवी "जाचक-कथा"

प्रिय भीमा,
तू सतत आमच्या आभाळावरुन उडणारं
शांततेचं अस्वस्थ कबुतर.
आणि आम्ही मुंग्या.
४३ वर्षांच्या एका मुर्दाड शिकाऱ्याच्या
टाचेखाली अडकलेल्या.
तू वाचवलंस आम्हाला चवदार तळ्यातल्या
काळ्या पाण्यात बुडताना
एकेक पान खुडून खुडून संस्कृतीचं.
शिका, एक व्हा, संघर्ष करा म्हणत.

आम्ही ऐकतोय अजून तुझा दैवी आवाज
तुझ्या जयंती-स्मृतिदिनांच्या मंडपातून येणारा.

ह्या मुंग्यांना माफ कर भीमा,
टाचेखालच्या गवतातच त्यांना एक गगन
गवसलं आहे/सुरक्षित वाटू लागलं आहे,
आणि तुझ्या आवाजातला झंझावात
त्यांना मंत्र्याच्या गाडीवरच्या
लाल दिव्यासारखा परका परका वाटू लागलाय..

॥दोन॥

ह्या शताब्दीसोहळ्यात तुझ्या लक्षात आले
काय भीमा,
की तुझ्या आवाजातला अंगार
इथल्या प्रजासत्ताक कातडीवर
एक शहाराही उमटू शकत नाही ते?
मुंग्या आता डबक्यात बुडत नाहीत. इतकेच.
पण हे डबके कायमचे हलवण्यासाठी
चौकाचौकात उभ्या केलेल्या
तुझ्या पुतळ्यांचा देखावा उपयोगाचा
नाही भीमा!

उलट तुझ्या काळ्या ब्रॉन्झच्या
निर्जीव पुतळ्यात तुला निरंकुश पाहताना
साऱ्यांनाच कसे सुटका झाल्यासारखे
मोकळे मोकळे वाटत आहे ते... बघ!

॥तीन॥

अरे भीमरावा, सांग
तू सारथ्य करावंस आमच्या मनोरथाचं
आणि तुझ्या कर्तृत्वाचं चाक जातीच्या चिखलात
रुतावं, एवढीच आमची नियती होती काय?
आणि साऱ्यांवर समतेचं तीर्थ शिंपडणारा
तुझा, घटनेचा अंगठा कापून घेऊन
तुला एकलव्यासारखं एकटं पाडायचं
एवढाच सम्यक इतिहास तुला लाभला
होता काय?
तू चालत गेलास गटारातून,
थेट बोधिवृक्षांच्या प्रदेशात
एखाद्या राजसंन्यासासारखा—
दिवे लावीत, रस्त्यांच्या दुतर्फा
"जग बदलविण्याची" स्वप्नं पेरीत—
आज इथला कुठलाच राजमार्ग
आनंदनगर आणि सिध्दार्थनगरच्या
वस्तीवरुन जात नाही भीमा.
तुझ्या आदेशांचा कंदील एकट्याने
लटकतोय भिंतीवर
मोर्चामोर्चाने येऊन साऱ्यांनी त्यातली
लांबलचक वात ओरबाडून नेलीय....

॥चार॥

भीमा, तू हे काय केलंस बाबा,
शिकवता - शिकवता
व्यवस्थेच्या कपाळावरच्या खपल्या उचकटून
गेलास,
आणि भळभळून टाकलास अवघा समाज.
दशका मागून दशके चाललीत
आणि तुझ्या धर्मांतराचं पाणी आता आमच्या
सगळ्यांच्याच जखमेतून वाहू लागलंय......

॥पाच॥

भीमा,
अरे, तुझ्या स्मृतीदिनांच्या पहाटे वीर्यवान
झालेला सूर्य. संध्याकाळी
भाषणांनी/आश्वासनांनी नपुंसक
झालेला पाहतो आम्ही.
आणि तुझ्या सुटाबुटातल्या छबीनं
आक्रमक होण्याऐवजी आम्ही
गलितगात्र बंदासारखे गुंगीत जातो
मग भीमा, असे वाटते,
की ह्या पताका लावताना, रोषणाई करताना
जणू आमच्या जखमेवर ऑफसेट कलरचं
शोभिवंत बँडेजच बांधीत आहोत आम्ही.
आणि संघर्षाचे तान्हुले पोर घेऊन
आम्ही बाजारच्या आडरस्त्याने
सरणाकडे चाललो आहोत... चालत आहोत!

॥सहा॥

माफ कर भीमा...
तू आमच्या आभाळावरचा निरंतर पक्षी-मान्य!
तुला हे आख्खं आभाळ मिळेल
दिवसभर विहरण्यासाठी... मान्य!
अगदी पार्लमेंट हाऊसच्या शिखरावरचं
बोट क्लबच्या मैदानावरचं,
लाल किल्ल्याच्या बुरुजावरचं!
सारं मिळेल... दरवर्षी... जयंतीला...
स्मृतिदिनाला.

पण वस्तीसाठी, रात्रीच्या वेळी
ऊब देणारं एक हक्काचं खोपटं मिळणं
खूप कठीण आहे भीमा.
खूप खूप कठीण आहे... ह्या देशात!

——— अरुण म्हात्रे

---

## तेंव्हा...

जेथे गागरा नाही
अशी एखादी वाट असेल काय?
जेथील काळोख संपला
असे एखादे गाव असेल काय?
ही पृथ्वी आता-चंद्रावर वस्ती करू लागेल
तेव्हा गावकुसाबाहेरील वस्ती नसेल काय?

——— दया हिवराळे

---

## समारोप

शस्त्रांच्या सावल्या अंगावर पडल्या म्हणून
उन्हापासून बचाव होतो
अश्या खुळ्या समजुती जोपासणारा मी नाही
मनूच्या देव्हाऱ्यात शूद्रांच्या वेदवाचनाच्या गोष्टी
तुम्ही मला सांगू नका.
झरे कोठून उगवतात आणि कोठे आटतात
हे मला चांगले ठावूक आहे.
माझ्या दाढीतल्या काळ्या-पांढऱ्या केसांचा हिशोब
तुमच्या जळकुंडात अहोरात्र चाळत असतो
पण घडते असे की,
माझ्या मुळापर्यंत तुमच्या पारंब्या पोहचतच नाहीत
हल्ली नाड्या भूमिगत करूनच मी
आजवरच्या सर्व भूकंपांचे उत्खनन करीत आहे.
अन्यथा तुमच्या वेदी आणि जल्लाद
असे बेकार झाले नस्ते.
गळा कापण्याआधी टिळा लावण्याच्या तुमच्या
शास्त्रशुध्द नोंदी अजूनही माझ्यापाशी आहेत
माझ्या सत्काराचे स्वप्न पाहणे आता सोडून द्या.
तुमच्या स्मृती-शास्त्रांच्या समारोपासाठी
आलो आहे मी.

——— बळी खैरे

---

## भूमिका

सॉरी, सद्यस्थितीत मी तुमचे
काहीही ऐकून घेण्याच्या मनःस्थितीत नाहीये.
तुम्ही कृपया ऐकवू नका मला
युध्दात शरणागती पत्करल्याने जीवनदान मिळते
किंवा,
अणूबॉंबचा वापर फक्त शांततेसाठीच व्हावा
कारण
माझ्या मेंदूत फार आधीपासूनच
अणूबॉंब बनण्याची प्रक्रिया सुरू झाली आहे.
मी तुमच्याशी दोन हात करायला
कधीचा तयार आहे
आता मी अडकून पडू इच्छित नाही
प्रेयसीच्या नाजूक विळख्यात
या पुढे मी करणार नाही
पुस्तकी ज्ञानाचा वापर
मला काहीतरी कृती केलीच पाहिजे
माझी भूमिका स्पष्ट केलीच पाहिजे

"माणसांसाठी लढणारा मी!"

तुम्ही कृपया करू नका मला
तुमच्या 'फॅसिस्ट' डोळ्यांनी शांततेचं आवाहन
मी माझी 'कीट' पाठीवर बांधलेली आहे
माझे पाय
युध्दभूमीचा रस्ता चालू लागले आहेत.

——— मंगेश बनसोड

---

## वस्तीची कविता

बापाच्या छातीच्या बरगड्या
आईच्या डोक्याचा पेटारा
मला तुझ्यात गुंतू देत नाहीत

इतिहासाच्या पानापानात दडलेल्या
माझ्या आज्यापंज्यांच्या शोषणाच्या शोकांतिका
मला तुझ्या गजऱ्याचा सुगंध घेऊ देत नाही.

काळ्या पाण्याची शिक्षा भोगणाऱ्या
कैद्यासारखी इथली एक-एक वस्ती
काळ्या विवरात लोटत असते
इथल्या प्रत्येकाला अनाहूतपणे!
तीस वर्षाची तरुणी साठ वर्षाची म्हातारी होते
पापड लाटता-लाटता किंवा बिड्या बांधता बांधता
आणि चाळीस वर्षाचा रिक्षेवाला बनतो
ऐंशी वर्षाचा जर्जर म्हातारा
त्यांच्या डोळ्याभोवतीची काळी वर्तुळं
बघितली की,
माझ्यातला रोमॅण्टीक हिरो पार गुदमरुन जातो.

मी तुझ्यात गुंतू शकतो, पार डुंबू शकतो
तू फक्त एक कर –
माझ्या डोक्यातला मेंदू माझ्या आठवणींसह
बदलवून टाक.

——— चंद्रकांत सरदार

## तुझ्या शहरातील तुझ्या कविता

॥१॥

ऐन वसंतात
शहरातली तुझ्या ही झाडं
नागडी उघडी कशी
आणि सगळीच पाखरं अशी
मुकी कशाने झालीयेत ?
तुझ्या भग्न काळजाच्या पिंजऱ्यात
शहरातल्या पाखरांना
तू बंदिस्त केलंस म्हणे !
पाखरांना मनसोक्त उडू देणं चांगलं
नाहीतर पंख दुखतात त्यांचे
आणि रडतात काळजं ओक्साबोक्सी !

॥२॥

तुला विध्वंसाची भीती वाटतेय का ?
तुला तुझं शहर प्रिय नाही का ?
तुझं शहर
पेटलंय चोहीकडून तरीही
तू इतकी काकडलेली कशी ?
निखारे तुझ्या शहराचे
तू कवटाळ अशी
म्हणजे
चेततील तुझीही रंध्रनिरंध्र !

॥३॥

तुझं शहर पूर्वीसारखंच
हिरवेगर्द झालेलं पहायचंय का तुला ?
पाखरांचा किलकिलाट ऐकायचाय का तुला ?
आणि तुझं शहर नव्यानं
हसतांना, झुलताना पहायचंय का तुला ?
मग,
उघड तुझ्या शहराच्या वेशीचा
लोखंडी दरवाजा आणि
येऊ दे आत मला.
तुझ्या शहराचा हरवलेला चेहरा
शोधण्याचा
मी नक्कीच प्रयत्न करीन !

— सुरेश नामदेव कांबळे

---

## षंढ

वाचन-मनन-चिंतन, दोन रुपयाची भजी
यावर मी दिवसभर
सिंहासारखा जगतो गं !
कुठल्याही शेळी-मेंढीचा वास
मला स्पर्श करत नाही

शिल्पे,
तुकडोजी महाराजांच्या भजनातील
माझं घर आहे
त्याला ताटी नाही की दार नाही
येणाऱ्या-जाणाऱ्याचं कुठं नाव नाही
इथं येणारा प्रत्येकजण
बंदूक शस्त्रादी खांद्यावर घेऊनच येत असतो.

शिल्पे,
भरलेली बंदूक खांद्यावर घेऊन
तुझ्या वस्तीत यावं
तुझ्यासारख्या अनेक जणींचा
गळा सोडून छाती पिचकून खून करावा
मध्ये जो आडवा येईल
त्याच्यावर खांद्यावरील बंदूक खाली करावी
अशा शांत विचारात मी !
आणि
तू करीत असतेस
'कठीण कठीण कठीण किती'चा सराव !

शिल्पे,
तुझे स्वर माझ्या मेंदूत
वासनांचे वळ उठवून गेले
त्यांनी माझे लिंग केव्हाचेच छाटून नेले
शिल्पे, आतापर्यंत मी सिंह होतो गं !
ही रात्र आता मला
षंढ बनविणार आहे !

— रोहन नागदिवे

---

## ॥दलित ब्राम्हणांसाठी एक कविता॥

तुम्ही म्हणता तसे सारेच बिघडलेले नाही अजून
इथली माती
इथला सूर्य
इथली हवा
इथले पाणी
ह्या साऱ्यांना अजूनही माणसाचा वास येतो

तुम्ही निर्माण केलेल्या परीकथा तुमच्या भयास्तव
आणि सरकारी सुरक्षित खिडकीतून वाराही येणार नाही
याची दक्षता घेऊन
तुम्ही न्याहाळलेले इथले वास्तव
दाखवत राहतं तुम्हाला
पाण्याच्या पोटातून बेलगाम वाहणारे रक्ताचे पाट
पोटात नळ्या आहेत म्हणून देहाने विकलेल्या
योनीचे मठ
दम्याच्या पाठशाळेत दाखल होत जाणाऱ्या
तरुणांच्या जथा
आणि श्वासाच्या अंतरावर उभे राहूनही
ज्यांचे श्वास मोजता येत नाहीत
अशा अस्तित्वाच्या यात्रा
हे सारं वास्तव तुम्हाला दिसतं
हे सारं वास्तव तुम्ही पाहता
पण हे ही वास्तव आहे की
प्रत्येक माणसातून वाहत असते एक पवित्र माणूसकी
जी रक्तातून शोधून काढते महाडचे पाणी
प्रत्येक स्तनात हलत असतो एक पाळणा
जो गात असतो गौतमीची प्रेमळ गाणी
प्रत्येक तरुणाच्या नष्ट होत चाललेल्या
फुप्फुसात असतो
एकतरी उगवतीचा श्वास
जो सूर्याला आज्ञा देण्याची स्वप्ने असतो पहात
आणि श्वासाच्या अंतरावर
श्वासच असतो माणसाचा
हे ही उमगून असतो प्रत्येक श्वास
त्यामुळे हे सारे बदलेल
न बदलेल
पण तुम्ही म्हणता तसे सारेच बिघडलेले नाही अजून
इथली माती- इथला सूर्य- इथली हवा
इथले पाणी- इथली प्रणाली -इथली गाणी
ह्या साऱ्यांना अजूनही माणसाचा वास येतो

— श्रीधर तिळवे